GR-200407191319350001-2500

विशेष घटक योजना
स्वयंसहाय्यता बचत गटावर
आधारित महिला सक्षमीकरण
कार्यक्रम...

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्र. माविम-२००१/प्र.क्र.४/का-१०
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ७ जानेवारी, २००३

वाचा :- शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. माविम-२००१/प्र.क्र.१०/का-१०, दि.२० जानेवारी, २००२.

प्रस्तावना :- महिला धोरण-२००१ मध्ये घेण्यात आलेल्या निर्णयानुसार व दि. २० जानेवारी, २००२ रोजीच्या शासन निर्णयानुसार महिला आर्थिक विकास महामंडळाची पुनर्रचना करण्यात आली असून या महामंळास राज्यातील महिला विकासाच्या कामासाठी **शिखर संस्था** म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच शासनाच्या सर्व विभागांनी त्यांचे कार्यक्रम राबविण्यासाठी स्वयंसहाय्यता बचत गट संकल्पनेवर आधारित योजना तयार करुन त्या महिला आर्थिक विकास महामंडळाकडे राबविण्यासाठी द्याव्यात असाही निर्णय घेण्यात आला आहे. महाराष्ट्र शासनाच्या धोरणास अनुसरुन विशेष घटक योजनेंतर्गत स्वयंसहाय्यता बचत गटावर आधारित महिला सक्षमीकरण कार्यक्रम राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :- शासनाच्या वरील धोरणास अनुसरुन राज्यातील ३३ जिल्हयांमध्ये स्वयंसहाय्यता बचत गटावर आधारित महिला सक्षमीकरण कार्यक्रम, विशेष घटक योजनेंतर्गत राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या योजनेंतर्गत तीन वर्षाच्या कालावधीमध्ये २०,२५० स्वयंसहाय्यता बचत गटाची स्थापना महिला आर्थिक विकास महामंडळातर्फे करण्यात येईल. या गटांमध्ये अनुसूचित जाती / नवबौध्द घटकांच्या महिलांचा अंतर्भाव करण्यात येईल. याकरीता तीन वर्षासाठी प्रतिगट १०,०००/- याप्रमाणे २०,२५० गटांकरीता रु. २०,२५,०००००/- ( एकूण रु.वीस कोटी पंचवीस लाख रुपये फक्त ) इतका निधी सामाजिक न्याय विभागाच्या विशेष घटक योजनेमधून उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर योजना २००२-२००३ या वर्षापासून सुरु करण्यात यावी. योजनेच्या सुरुवातीस २००२-२००३ या वित्तीय वर्षात महिला आर्थिक विकास महामंडळास रु. १.०० कोटी ( रु. एक कोटी फक्त) उपलब्ध करुन देण्यात येतील. उर्वरित निधी २००३-२००४, २००४-२००५ व २००५-२००६ या वर्षात आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन देण्यात येईल.

२. **महिला सक्षमीकरण कार्यक्रम** राबविण्यासाठी गावाची निवड, गावाचे सर्वेक्षण, गटांची बांधणी, प्रशिक्षण, मूल्यमापन व नियंत्रण इ. सर्व जबाबदारी महिला आर्थिक विकास महामंडळाची राहील. महिला आर्थिक विकास महामंडळाने भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल दर तीन महिन्यांनी शासनास सादर करावा.

३. हा शासन निर्णय सामाजिक न्याय विभागाच्या, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(चंद्रसेन तुरकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई.
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.
सर्व विभागीय महिला व बाल विकास अधिकारी.
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
सर्व महानगरपालिका / नगरपालिका व नगरपरिषदा.
यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी,पुणे.
सर्व मंत्रालयीन विभाग.
महिला व बाल विकास विभाग (सर्व कार्यासने)
निवडनस्ती, का-१०.